आदिवासी विकास विभागातील बांधकाम व्यवस्थापन कक्षांतर्गत आदिवासी उपयोजना क्षेत्रातील (TSP) तसेच आदिवासी उपयोजना बाहय क्षेत्रातील (OTSP) शासकीय आश्रमशाळा/ वसतीगृह इमारतींची देखभाल व दुरुस्ती योजनांच्या कामांच्या वर्गीकरणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन शुध्दीपत्रक क्रमांक शाआबां-२०२४/प्र.क्र.१५४/का.१३**

( ई-ऑफीस क्रमांक ८९९७०१)

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १३ फेब्रुवारी, २०२५

**वाचा -:**

१) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः पदआ-३८१७/प्र.क्र.१३९/का.१५, दिनांक १६ नोव्हेंबर, २०२२.

२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः शाआबां-२०२४/प्र.क्र.१५४/का.१३, दिनांक ५ ऑगस्ट, २०२४.

३) आयुक्त, आदिवासी विकास, आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांचे पत्र जा.क्र. प्रशा-२०२४/प्र.क्र.८४/ का २(२)/८३०५, दिनांक १२ डिसेंबर, २०२४.

**प्रस्तावना :-**

आदिवासी विकास विभागातील बांधकाम व्यवस्थापन कक्षांतर्गत आदिवासी उपयोजना क्षेत्रातील (TSP) तसेच आदिवासी उपयोजना बाहय क्षेत्रातील (OTSP) शासकीय आश्रमशाळा/ वसतीगृह इमारतींची देखभाल व दुरुस्तीच्या कामांचे प्रकल्प अधिकारी / कार्यकारी अभियंता, सा.बां. (आदिवासी) विभाग / शाळा व्यवस्थापन समिती/ शासकीय आश्रमशाळेचे मुख्याध्यापक / वसतीगृहांचे गृहपाल यामध्ये विविध कामांचे वर्गीकरण करण्यास संदर्भ क्र. २ येथील दिनांक ५ ऑगस्ट, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये कार्यप्रणाली निश्चित करण्यात आली आहे.

२. प्रस्तुत शासन निर्णयामध्ये प्रामुख्याने स्वच्छतेच्या दृष्टीकोणातुन शौचालय व स्नानगृहांची साफ सफाई करणे, इमारतीमधील केरकचरा काढणे, पाण्याची टाकी साफ सफाई करणे , हॅन्डवॉश बेसीन नियमीत स्वच्छ करणे, संकुल परिसर व खेळाचे मैदान स्वच्छता साफ सफाई करणे, तुंबलेले चेंबर सफाई करणे इ. कामे करण्याचे अधिकार प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प/मुख्याध्यापक (शाळा व्यवस्थापन समिती) स्तरावर प्रदान करण्यात आलेले आहेत.

३. शासकीय आश्रमशाळा व वसतीगृहातील विद्यार्थ्यांसाठी तसेच परिसरातील दैनदिन स्वच्छते साठी एका सफाईगारास परिसर स्वच्छ ठेवणे शक्य होत नाही, परिणामी स्वच्छतेबाबत तक्रारी प्राप्त होत असतात. आदिवासी विभागांतर्गत असणाऱ्या मुला- मुलींचे शासकीय वसतीगृह व

निवासी आश्रमशाळा यामध्ये मंजूर आकृतीबंधानुसार शासकीय आश्रमशाळा व शासकीय वसतीगृहांमध्ये बहुउद्देशिय कर्मचारी यांची पदे ही बाहयस्त्रोताव्दारे घेण्याचे संदर्भ क्र. १ अन्वये निश्चित करण्यात आलेले आहे. शासकीय आश्रमशाळा व वसतीगृहातील निवासी विद्यार्थी संख्या व त्या प्रमाणात इमारतींमध्ये उपलब्ध असलेली स्नानगृहे व स्वच्छता गृहे यांची संख्या पाहता वसतीगृह व आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांना सोई-सुविधा उपलब्ध होण्याच्या अनुषंगाने तांत्रिक पध्दतीने सेवा (Machanized Cleaning Service ) देणे आवश्यक आहे. आयुक्त, आदिवासी विकास, आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी संदर्भ क्र. ३ अन्वये प्रस्तावित केल्यानुसार, उपरोक्त स्वच्छेतसंदर्भातील सेवा बाहययंत्रणेद्वारे उपलब्ध करुन घेण्याकरिता संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयामधून उक्त स्वच्छतेची कामे वगळण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन शुध्दीपत्रक :-**

प्रस्तावनेत नमूद पार्श्वभूमी विचारात घेता, संदर्भ क्र. २ येथील दिनांक ५ ऑगस्ट, २०२४ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद १(अ) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास विभाग अंतर्गत अ.क्र. (१) (ii.) शौचालय व स्नानगृहांची दैनंदिन साफसफाई करणे, अ.क्र. (१)( iii). आश्रमशाळा व वसतीगृह इमारतीत दैनंदिन केरकचरा काढणे तसेच परिच्छेद १(आ) शाळा व्यवस्थापन समिती अंतर्गत अ.क्र. (१)(v). Syntex पाण्याची टाकी साफसफाई करणे, (vi). Handwash Basin नियमित स्वच्छ करणे, (xiv) संकुल परिसर व खेळाचे मैदान स्वच्छता साफसफाई करणे, (xv) तुंबलेले चेंबर सफाई करणे या बाबी वगळण्यात येत असल्याने उक्त परिच्छेद खालीलप्रमाणे वाचावा.

अ) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास विभाग

१) वार्षिक देखभाल दुरुस्तीचे वार्षिक करारनामे पुढीलप्रमाणे करणे.

i. आर. ओ. जलशुध्दीकरण यंत्रे दुरुस्ती

ii. * **वगळले.**

iii. *** वगळले.**

iv. सोलार पॅनेल दुरुस्ती.

v. गिझर दुरुस्ती.

vi. जनरेटर सेट दुरुस्ती इ.

आ) शाळा व्यवस्थापन समिती:-

१) एकावेळी कमाल रु. ५० हजार पर्यंतच्या मर्यादेत कामे करण्याबाबत.

i. तुटलेले जुने दरवाजे दुरुस्ती करणे अथवा काढुन नविन दरवाजे बसविणे, (७-८ मर्यादीत)

ii. कडीकोयंडे दुरुस्ती करणे किंवा नविन बसविणे.

iii. नळांची दुरुस्ती करणे किंवा नविन बसविणे.

iv. मग, बादल्या, झाडु इ. पुरवठा करणे.

v. * **वगळले.**

vi. Handwash Basin बसविणे.

vii. शौचालयाचे ३-४ भांडे बसविणे. (किरकोळ संख्या)

viii. छतावरील जुने तुटलेले पत्रे काढुन नवीन पत्रे बसविणे.

ix. भागाभागातील तुटलेली / खचलेली फरशी काढुन त्यावर PCC करणे किंवा नवीन फरशी बसविणे.

x. पाण्याच्या टाकीपासुन नळापर्यंतचे काही खराब पाईप काढुन नवीन बसविणे.

xi. एक ते दोन चेंबर्सची दुरुस्ती करणे.

xii. किचन ओट्याची दुरुस्ती करणे.

xiii. दरवाजे, खिडक्यांना रंगकाम करणे.

xiv. * **वगळले.**

xv. * **वगळले.**

xvi. नादुरुस्त बल्य व टयुब, फळे, SWITCH BOARD इ. बदलणे.

२. उपरोक्त बदल वगळता संदर्भ क्र. २ येथील दिनांक ५ ऑगस्ट, २०२४ रोजीच्या शासन निर्णयातील अन्य कामे तसेच अटी व शर्ती जशाच्या तशा लागू राहतील.

३. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२५०२१३१८३२३८५३२४ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJESING FATTESING VASAVE

Digitally signed by VIJESING FATTESING VASAVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=5494d2ad3a3bc5ddd66daf9a8f17ceec5e2d7d4b6a8bba99c51d275801bcdf1b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2182F4F20DAA6841AB430B2FD812E7B5D3A883E72EFA574CA5E29FF528BC8015, cn=VIJESING FATTESING VASAVE
Date: 2025.02.13 18:34:02 +05'30'

**( वि. फ. वसावे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुबंई.
२) मा. सभापती/ उपसभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
९) सर्व मा. विधानपरिषद/ विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

१०) मुख्य सचिव यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई.
११) अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई, नागपूर.
१४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई, नागपूर.
१५) आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक.
१६) सर्व जिल्हाधिकारी.
१७) मुख्य अभियंता, वांधकाम व्यवस्थापन कक्ष, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / ठाणे/अमरावती/ नागपूर.
१९) सर्व नियंत्रक अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प (सर्व).
२१) अधीक्षक अभियंता, सा.बां. (आदिवासी) मंडळ, नाशिक/ नागपूर.
२२) कार्यकारी अभियंता, सा.बां. (आदिवासी) विभाग, ठाणे/नाशिक/अमरावती/ चंद्रपूर.
२३) निवड नस्ती (का.१३)